इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना भारत सरकारची मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजना या योजनेकरिता केंद्र शासनाकडून सन २०१६-१७ या वित्तीय वर्षातील तिसऱ्या हप्त्यापोटी प्राप्त झालेला रु. ६९८.४० लक्ष इतका निधी, सन २०१८-१९ मधील अर्थसंकल्पीय तरतुदीतून वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,**
**शासन ज्ञापन क्रमांक शिवृती २०१८/प्र.क्र.१३८/शिक्षण,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,**
**दि. ३१.१०.२०१८**

**वाचा**- केंद्र शासनाचे क्र. ११०१४/०१/२०१४-BC-I,दि. २०.०३.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना -**

राज्यातील इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना केंद्र पुरस्कृत मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत केंद्र शासनाने सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये एकुण रु. ८४,९०,४०,०००/- इतका निधी राज्यास वितरीत केला आहे. सदर निधीपैकी उपरोक्त संदर्भाधीन दि. २०.०३.२०१७ रोजीच्या पत्रान्वये तिसऱ्या हप्त्यापोटी रु. ६९८.४० लक्ष निधी केंद्र शासनाने वितरीत केला आहे. तथापि, सदर निधी अद्याप वितरीत न झाल्याची बाब निदर्शनास आल्यामुळे सदर निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील तरतुदीतून भागविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**ज्ञापन-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना भारत सरकारची मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेकरिता मुख्य लेखाशीर्ष २२२५ ई ९९१ (कार्यक्रम) अंतर्गत रु. ३८५,९२,२७,०००/- इतक्या निधीची तरतुद करण्यात आली आहे. सदर निधीतून केंद्र शासनाने सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील तिसऱ्या हप्त्यापोटी रु. ६९८.४० लक्ष इतकी तरतुद खर्च करण्यास या द्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** या बाबीवरील खर्च मागणी क्रमांक झेड जी-३, मुख्य लेखाशिर्ष -२२२५ अनुसूचित जाती अनुसचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, २७७-शिक्षण, (०२) शिष्यवृत्या /विद्यावेतने (०२) (१२) इतर मागासवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रीकोत्तर शिष्यवृती (केंद्र पुरस्कृत योजना १०० टक्के), (२२२५ई ९९१) ३४-शिष्यवृत्या / विद्यावेतने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागवावा.

**०३.** वरील अनुदानाबाबत संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय, पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनातूनच खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे

खर्चाचे विवरण (जिल्हानिहाय खर्च/लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्याची दक्षता, संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

**०४.** उपरोक्त योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधिन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करुन कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

**०५.** नियंत्रक अधिकारी यांनी निधी खर्च करताना वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकामधील अटींची पुर्तता झाली असल्याची खातरजमा करुन निधी वितरीत करण्यात यावा.

**०६.** सदर ज्ञापन वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र. ३७६/ व्यय-१४, दिनांक १५.१०.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**०७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०११६०९५६०१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2018.11.01 16:19:13 +05'30'

**( भा.र.गावित )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
३. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
४. वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
५. संचालक, लेखा व कोषागारे, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती (शिक्षण)